स्वयंसेवी संस्थामार्फत अपंगांसाठी चाल
येणा-या कर्मशाळांना इमारत भाडे अनु
१०० टक्के देण्याबाबत...

महाराष्ट्र शासन
समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग,
शासन निर्णय क्रमांक: इडीडी-१०९२/१६९६२/के. नं. ३१०/सुधार-२.
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०००३२.
दिनांक: ७ नोव्हेंबर, १९९५.

वाचा:- १] शासन निर्णय क्र. ईडीपी-११६९/७४८५७/एन, दि. ३०.१.७१
२] संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रमांक
अपंवि/इमारत भाडे/९१-९२/का-२, दि. २०.४.१९९२.

शासन निर्णय:- स्वयंसेवी संस्थामार्फत राज्यात अपंगांसाठी चालविण्यात येणा कर्मशाळांना इमारत भाडे अनुदान खर्चाच्या ५०टक्के इतके देण्यात येत होते. अ विशेष शाळांना ज्याप्रमाणे १०० टक्के इमारत भाडे मंजूर केले जाते, तसेच ते अ र्मशाळांनाही मिळावे, असा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यास अपंगांसाठी चालविण्यात येणा-या कर्मशाळांना दि. १ एप्रिल, १९९५ पासून इ भाड्यापोटी १००% अनुदान देण्यास शासन मंजुरी देत आहे.

२. या बाबींवर होणारा खर्च, "२२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण-०२-कल्याण-१०१-अपंगांचे कल्याण (१) अंधांचे शिक्षण व कल्याण [२](ए) अंधांसा करणा-या बीन सरकारी संस्थांना सहाय्य [२] मुके व बहीरे यांचे शिक्षण व [दोन] बहीरे व मुके यांच्यासाठी कार्य करणा-या अशासकीय संस्थांना सहा [३] अस्थि विकलांग व्यक्तींचे शिक्षण व कल्याण [पाच][ए] अस्थि विकलांग साठी काम करणा-या बीन सरकारी संस्थांना सहाय्य मागणी क्रमांक एन-८ अर्थ शिर्षाखाली खर्ची घालण्यात येऊन तो सन १९९५-९६ या आर्थिक वर्षास केलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. पुढे शासन असेही आदेश देत आहे की, या प्रकरणी सन १९९५-९६ म होणारा खर्च आवर्ती स्वरुपाचा असून तो रु. १.०० लाखापेक्षा जास्त असल्या बाब विधान मंडळाच्या निदर्शनास आणून देण्यासाठी योग्य त्यावेळी अधि लाक्षणिक पूरक मागणी सादर करण्यात यावा.

४. संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे हे या संदर्भात आहरण व संवितरण अधिकारी राहातील. यांनी स्वयंसेवी संस्थामार्फत चालविण्यात ये अपंगांच्या कर्मशाळांच्या इमारत भाडे मंजूर करण्याबाबतच्या कागदपत्रांची करून अनुदान मंजूर करावे.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक ???/९५/व्यय-१२, दिनांक १३.६.१९९५ नुसार निर्गमित करण्यात

कृ.मा.प.

येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(स्वाक्षरी)

[ ब. वि. सोनावणे ]

उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.

सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी/सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी.

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर, अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

निवासी लेखा अधिकारी, मुंबई.

उच्च व तंत्र शिक्षण व सेवायोजन विभाग, मंत्रालय/वित्त विभाग/नियोजन विभाग/

शालेय शिक्षण विभाग.

कार्यासन अधिकारी/सुधार-२ [निवड नस्ती/समाजकल्याण विभाग. ]